राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या सर्व आश्रमशाळांची संचमान्यता करण्याबाबत सुधारीत मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांक विभशा-२०२०/प्र.क्र.५२३/विजाभज-२**
मंत्रालय विस्तार इमारत, पहिला मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ३१ मे, २०२४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, शिक्षण विभाग क्र. १६५३/दि.२२.१२.१९५३
२) संचालक, समाज कल्याण, सांस्कृतीक कार्य व क्रिडा व पर्यटन विभाग यांचे पत्र क्र.व्हीएएस १०८३/१६५३/४२०, दि.१८.११.१९८३
३) संचालक, समाज कल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.पोबेआशा/१८३/शिक्षक नेमणूक/का-१ दि.१४.०३.१९८४
४) समाज कल्याण, सांस्कृतीक कार्य व क्रिडा व पर्यटन विभाग, पत्र क्र.व्हीजेडब्लयु १०९०/प्रक्र.२२/प्रस्ताव-२/मावक-०६, दि.०८.१०.१९९१
५) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.व्हीएएस १०९५/प्र.क्र.१५३/मावक-६, दि.०४.१२.१९९५
६) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.व्हीएएस १०९५/प्र.क्र.१५३/मावक-६, दि.०२.११.१९९६
७) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.व्हीएएस १०९५/प्र.क्र.२८/मावक-६, दि.१५.०२.१९९७
८) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतीक कार्य व विशेष सहाय्य विभाग, विभशा-२००४/प्रक्र.९८/ मावक-०६ दि.१४.०२.२००६ व शुद्धीपत्रक दि.२४.०३.२००६
९) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतीक कार्य व विशेष सहाय्य विभाग, विभशा-२००४/प्र.क्र.९८/मावक-०६ दि.२४.०६.२००६
१०) केंद्र शासनाचा बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिकार अधिनियम-२००९
११) महाराष्ट्र बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिकार नियम-२०११
१२) महाराष्ट्र शासन इतर मागास बहुजन कल्याण विभाग आश्रमशाळा संहिता-२०१८
१३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र. एस.एस.एन-२०१५/प्र.क्र.१६/१५/ टीएनटी-२, दि. २८.०८.२०१५. आणि त्यानंतर निर्गमित झालेली सुधारणा.
१४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: क्र.एसएसएन-२०१५/प्र.क्र.१६/१५/टिएनटी-२, दि.०८.०१.२०१६
१५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: क्र.एसएसएन-२०१५/प्र.क्र.१६/१५/टिएनटी-२,दि.०२.०७.२०१६
१६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थस-२०२०/प्रक्र. ६५/अर्थ-३, दि.०४.०५.२०२०
१७) शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: विभशा-२०२०/प्र.क्र.५२३/विजाभज-२, दि.१९.१०.२०२०.
१८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: क्र.एसएसएन-२०१५/प्र.क्र.१६/१५/टिएनटी-२,दि.१५.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

राज्यात विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्गातील आणि ऊसतोड कामगारांच्या मुला मुलींना निवासी प्राथमिक शिक्षण देण्यासाठी शासनाने सन १९५३ पासून खाजगी सेवाभावी संस्थांना अनुदान देवून निवासी आश्रमशाळा सुरू करण्याचे धोरण सुरू केले आहे. त्यातील काही प्राथमिक आश्रमशाळांना वेळोवेळी श्रेणीवाढ देवून माध्यमिक निवासी आश्रमशाळा सुरू केल्या आहेत. सदर प्राथमिक / माध्यमिक आश्रमशाळांमधील प्रवेशित निवासी व अनिवासी विद्यार्थी संख्येवर अनुज्ञेय ठरणाऱ्या शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी पटपडताळणी / संच मान्यता करण्यात येते. या विभागाच्या प्राथमिक / माध्यमिक आश्रमशाळांमधील संचमान्यतेबाबत काही शासन निर्णय / परिपत्रके निर्गमित करण्यात आलेली आहेत. परंतु त्यामध्ये एकसुत्रता नसल्याने नियमाप्रमाणे संच मान्यता होते किंवा कसे याबाबत साशंकता असल्याने विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळाच्या आकृतिबंधाबाबत यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले सर्व शासन निर्णय / शासन परीपत्रक / आश्रमशाळा संहिता / शासनपत्र / मार्गदर्शक सूचना यांना एकत्रित करून शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, संदर्भ क्र.१७, दि.१९.१०.२०२० अन्वये पटपडताळणी / संचमान्यतेबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहे. परंतु सदर परिपत्रकामध्ये नमूद सूचनांनुसार विभागातील विजाभज आश्रमशाळांची संचमान्यता करण्यात आली असता, विभागनिहाय संचमान्यतेमध्ये एकवाक्यता दिसून येत नाही. बऱ्याच ठिकाणी समान विद्यार्थी संख्या असूनही अनुज्ञेय होणाऱ्या शिक्षक/शिक्षकेत्तर पदांच्या संख्येत तफावत दिसून येते. तसेच प्राथमिक आश्रमशाळांना अनुज्ञेय होणाऱ्या मुख्याध्यापकाच्या पदांबाबत देखिल संभ्रमता आहे.

बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा हक्क अधिनियम २००९ मधील तरतूदी विचारात घेऊन, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दि.१५.०३.२०२४ संदर्भ क्र.१८ अन्वये राज्यातील प्राथमिक, उच्च प्राथमिक व माध्यमिक शाळांतील विद्यार्थ्यांच्या पटसंख्येच्या आाधारावर शिक्षक पदे मंजूर करणे, एकाच वर्गात अधिक विद्यार्थी असल्यास विहित निकषाआधारे शिक्षक पदे मंजूर करणे इ. बाबतचे नियम तयार करण्यात आलेले असून, त्याच धर्तीवर इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत असलेल्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील संचमान्यतेमध्ये एकवाक्यता राहावी, याकरीता सुधारीत मार्गदशक सूचना निर्गमित करण्याबाबत लोकप्रतिनिधी तसेच आश्रमशाळा चालविणाऱ्या संस्थाकडून सातत्याने शासनस्तरावर मागणी होत असल्याने शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, संदर्भ क्र.१७, दि.१९.१०.२०२० मधील निकषात पुढीलप्रमाणे सुस्पष्ट सुधारणा/बदल (amendment) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शुध्दीपत्रक :-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित आश्रमशाळांच्या मंजूर पदांच्या आकृतीबंधानुसार वार्षिक पटपडताळणी व संचमान्यतेच्या अनुषंगाने शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, संदर्भ क्र.१७, दि.१९.१०.२०२० मधील परिच्छेद क्र.३ (अ) मध्ये शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, दि.१५.०३.२०२४ च्या धर्तीवर खालीलप्रमाणे सुधारणा/बदल (amendment) करण्यात येत आहेत.

## १. इयत्तानिहाय आश्रमशाळा व अनुज्ञेय पदे :-

| अ. क्र | शाळेचा प्रकार | गट | शाळेतील इयत्तेचा गट | विद्यार्थी संख्येचा गट | देय शिक्षक पद संख्या | देय पद मंजूर होण्यासाठी किमान आवश्यक विद्यार्थी संख्या | पूर्वीच्या मंजूर पदांस संरक्षण देण्यासाठी आवश्यक किमान विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | प्राथमिक व उच्च प्राथमिक आश्रमशाळा (इयत्ता १ली ते ४/५वी) | इ. १ ली ते ४थी/५ वी | इ. १ ली ते ४थी/५ वी ( किंवा यापैकी कोणतीही इयत्ता) | २० ते ३० | १ | २० | २० |
| | | | | ३१ ते ६० | २ | ४६ | ३१ |
| | | | | ६१ ते ९० | ३ | ७६ | ६१ |
| | | | | ९१ ते १२० | ४ | १०६ | ९१ |
| | | | | १२१ ते १५० | ५ | १३६ | १२१ |
| | | | | १५१ ते १८० | ६ | १६६ | १५१ |
| | | | | १८१ ते २१० | ७ | १९६ | १८१ |
| | | | | | २१० विद्यार्थी संख्ये पर्यत आरटीई निकषानुसार प्रति ३० विद्यार्थ्यामागे १ पद देय राहील | | |
| | | | | २११ ते २५० | ८ | २३१ | २१० |
| | | | | २१० विद्यार्थी संख्येनंतर प्रति ४० विद्यार्थ्यामागे १ पद देय राहील | | | |
| २ | उच्च प्राथमिक आश्रमशाळा (इ.१ ली ते ७/८ वी) | इ. ६ वी ते ८ वी | कोणतीही एक इयत्ता असल्यास | १० ते ३५ | १ | २० | २० |
| | | | | ३६ ते ७० | २ | ५३ | ३६ |
| | | | | ७१ ते १०५ | ३ | ८८ | ७१ |
| | | | | १०५ च्या पुढे | प्रति ३५ विद्यार्थ्यामागे १ पद देय राहील | | |
| | | | कोणत्याही दोन इयत्ता असल्यास | २० ते ७० | २ | ४० | ४० |
| | | | | ७१ ते १०५ | ३ | ८८ | ७१ |
| | | | | १०५ च्या पुढे | प्रति ३५ विद्यार्थ्यामागे १ पद देय राहील | | |
| | | | तीनही इयत्ता असल्यास | २० ते ६० | २ | २० | २० |
| | | | | ६१ ते १०५ | ३ | ६० | ६० |
| | | | | १०६ ते १४० | ४ | १२३ | १०६ |
| | | | | १४१ ते | ५ | १५८ | १४१ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | १७५ | | | |
| | | | | १७५ च्या पुढे | प्रति ३५ विद्यार्थ्यामागे १ पद देय राहील | | |
| ३ | माध्यमिक आश्रमशाळा (इ.९ वी ते १० वी) | इ. ९ वी ते १० वी | शाळेत कोणतीही एक इयत्ता असल्यास | २० ते ६० | १ | २० | २० |
| | | | | ६१ ते १०० | २ | ८१ | ६१ |
| | | | | १०१ ते १४० | ३ | १२१ | १०१ |
| | | | | १४१ ते १८० | ४ | १६१ | १४१ |
| | | | | १८१ ते २२० | ५ | २०१ | १८१ |
| | | | दोनही इयत्ता व प्रत्येक इयत्तेत किमान २० विद्यार्थी असल्यास | ४० ते १०० पर्यत | ३ | ४० | ४० |
| | | | | १०१ ते १४० | ४ | १२१ | १०१ |
| | | | | १४१ ते १८० | ५ | १६१ | १४१ |
| | | | | १८१ ते २२० | ६ | २०१ | १८१ |
| | | | | २२१ च्या पुढे | प्रति ४० विद्यार्थ्यामागे १ पद देय राहील | | |

१.१ इयत्ता १ ली ते ५ वी या गटामध्ये विद्यार्थी संख्येच्या गटासाठी आरटीईच्या निकषानुसार आवश्यक असलेल्या ३० विद्यार्थी संख्येच्या निम्म्यापेक्षा जास्त विद्यार्थी म्हणजेच (१५+१) १६ विद्यार्थी असल्यास पुढील पद देय होईल.

१.२ इयत्ता १ ते ५ वी गटामध्ये विद्यार्थी संख्येच्या गटापेक्षा विद्यार्थी संख्या कमी झाल्यास संरक्षित असलेले पद कमी होईल.

१.३ इ.१ ली ते ५ वी या गटातील २१० पेक्षा जास्त विद्यार्थी असल्यास देय पदांची गणना करताना २१० विद्यार्थ्यापर्यत ७ शिक्षक व त्यावरील (म्हणजेच २१० च्या पुढील विद्यार्थी संख्येनंतर) प्रति ४० विद्यार्थी संख्येवर १ पद देय होईल.

१.४ इ. ६ वी ते ८ वी गटामध्ये आरटीईच्या निकषानुसार आवश्यक असलेल्या ३५ विद्यार्थी संख्येच्या निम्म्यापेक्षा जास्त विद्यार्थी म्हणजेच (१७+१) १८ विद्यार्थी असल्यास पुढील पद देय होईल.

१.५ इयत्ता ६ ते ८ वी च्या गटामध्ये नव्याने पद मंजूर होण्यासाठी तक्त्यामध्ये नमूद किमान विद्यार्थी संख्या आवश्यक राहील.

१.६ इयत्ता ६ ते ८ वी च्या गटामध्ये मंजूर असलेले पद विद्यार्थी संख्येच्या गटापेक्षा विद्यार्थी संख्या कमी झाल्यास संरक्षित असलेले पद कमी होईल.

१.७ इयत्ता ९ वी ते इयत्ता १० वी या गटामध्ये २२० पेक्षा अधिक विद्यार्थी असल्यास पुढील नवीन पद देय होण्यासाठी गटासाठी आवश्यक असलेल्या ४० विद्यार्थी संख्येच्या निम्म्यापेक्षा जास्त विद्यार्थी म्हणजेच किमान २१ असल्यास पुढील पद देय होईल.

१.८ संबंधित व्यवस्थापनाने प्रत्यक्ष शिक्षक उपलब्ध करुन देतांना इयत्ता ६ वी ते ८ वी या गटासाठी मंजूर शिक्षक संख्येच्या मर्यादेत विषयनिहाय येणारा कार्यभार विचारात घ्यावा.

**टिप:-** संच मान्यता करताना खालीलप्रमाणे **"विद्यार्थ्यांचा"** समावेश करण्यात येत आहे.

१. मान्य निवासी विद्यार्थी विचारात घेण्यात यावे. (आधारकार्ड अनिवार्य) (मान्य निवासी संख्येच्या मर्यादेत)
२. विजाभज अनिवासी विद्यार्थी विचारात घेण्यात यावे. (आधारकार्ड अनिवार्य)
३. **इयत्ता १ ली ते ८ वी साठी अनिवासी विजाभजेतर प्रती वर्ग ४५ विद्यार्थी विचारात घेण्यात यावे. (आधारकार्ड अनिवार्य)**
४. आधारकार्ड नसल्यास विद्यार्थी संख्या संचमान्यता करतांना विचारात घेऊ नये.
५. शालेय शिक्षण विभागाने या विभागाच्या नस्तीवर अनौपचारिकरीत्या दिलेले अभिप्राय तसेच शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दि.२८.०८.२०१५ नुसार इयत्ता १ ली ते ८ वी तील अनिवासी विजाभजेतर विद्यार्थी संख्या १५ ऐवजी ४५ केल्यानंतर विद्यार्थी वाढीमुळे कोणतीही नवीन शिक्षकांची पदे अनुज्ञेय होणार नाहीत. संचमान्यतेनुसार वाढीव पदे निर्माण/मंजूर करावयाची असल्यास उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने मंजूर करता येतील.
६. संचमान्यतेनुसार वाढीव पदसंख्येनुसार उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने नवीन शिक्षकाचे पद मंजुर झाल्यास स्वतंत्र वर्गखोली असणे बंधनकारक राहील.

**२. मुख्याध्यापक पदे (प्राथमिक व उच्च प्राथमिक आश्रमशाळा) (इ.१ली ते ४/५वी किंवा इ. १ली ते ७/८ वी)**

| अनु.क्र. | पद | गट | पट संख्येचा निकष | देय पदे | पूर्वीच्या मंजूर पदांस संरक्षण देण्यासाठी आवश्यक किमान विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १. | मुख्याध्यापक | इ. १ ली ते ४/५ | १५० | १ | १३५ |
| २. | मुख्याध्यापक | इ. १ ली ते ७/८ | १५० | १ | १३५ |

**३. मुख्याध्यापक पदे (माध्यमिक आश्रमशाळा)**

| अ क्र | शाळा प्रकार | पद | विद्यार्थी संख्या /शिक्षक पद संख्या | पद संख्या |
|---|---|---|---|---|
| १. | इ. १/५ ली ते इ.१०वी, इ. १ /५ ली ते इ.१२ वी **आणि** इ. ८ वी ते इ.१० वी, इ.८ वी ते इ.१२ वी | मुख्याध्यापक | १५० किमान विद्यार्थी संख्या | १ |

**३.१.** उक्त तक्त्या मधील निकषानुसार मुख्याध्यापकाचे पद अतिरिक्त ठरत असल्यास त्यांना त्या त्या व्यवस्थापनाच्या अन्य शाळांमध्ये समायोजित करावे. पुर्ण जिल्हयात किंवा त्याच व्यवस्थापनाच्या कार्यक्षेत्रात मुख्याध्यापक अतिरिक्त ठरत असल्यास त्यांना शिक्षकांच्या रिक्त पदामध्ये रिक्त जागेवर समायोजित करावे, परंतु त्यांना वेतन संरक्षण देण्यात यावे.

४. शासन निर्णय, संदर्भ क्र.१८ अन्वये शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत असलेल्या शाळांना अनुज्ञेय असलेली उप मुख्याध्यापक / पर्यवेक्षक / विशेष शिक्षकांची पदे इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित आश्रमशाळेसाठी मंजूर पदांच्या आकृतीबंधात अनुज्ञेय असल्यास सदर पदे राज्याच्या एकूण पायाभूत पदांच्या मर्यादेत उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेनंतर मंजुर करण्यात येतील.

५. सरल प्रणालीतील केवळ आधार क्रमांक प्रमाणित असलेली दि.३० सप्टेंबर अखेरची विद्यार्थी संख्या संच मान्यतेसाठी ग्राह्य धरण्यात यावी. संकेत स्थळावर संच मान्यतेची कार्यवाही पूर्ण करुन सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संच मान्यता संबंधित आश्रमशाळांना शाळांना १५ ऑक्टोबर पर्यत वितरीत करतील आणि १५ नोव्हेंबर पूर्वी अतिरिक्त ठरलेल्या शिक्षकांचे शासनाने वेळोवळी शासन निर्णय/ परिपत्रक इ. द्वारे निश्चित केलेल्या निकष/नियमानुसार समायोजन पूर्ण करण्यात येईल.

६. आश्रमशाळेत उपलब्ध असलेल्या वर्ग संख्येपेक्षा अधिक शिक्षक पदे मान्य होत असल्यास त्याप्रमाणे आश्रमशाळेत वर्ग खोल्यांची संख्या असणे बंधनकारक राहील.

७. उपरोक्त निकषांन्वये पूर्वीच्या मंजूर पदास संरक्षण देण्याची तरतूद करण्यात आल्यामुळे विद्यार्थ्यांच्या संख्येनुसार शिक्षकांची संख्या मंजूर करतांना शिक्षक अतिरिक्त ठरल्यास अशा शिक्षकांना अतिरिक्त ठरवितांना संबंधित शाळेमध्ये प्रत्येक विषयाचे शिक्षक उपलब्ध राहतील आणि आरक्षण धोरणांची काटेकोरपणे अंमलबजावणी होईल याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी. तसेच शिक्षकांच्या समायोजनाबाबत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय, आश्रमशाळा संहिता आणि महाराष्ट्र खाजगी शाळा कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतूदी आणि त्याअनुषंगाने निर्गमित करण्यात आलेले प्रचलित निकष कायम राहतील.

८. शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, दि.१९/१०/२०२० मधील अन्य निकष / नियम / तरतुदी पुर्वी प्रमाणेच लागू राहतील. सदर शासन परिपत्रक तसेच या शुद्धीपत्रकातील बदल/ सुधारणा नुसार सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून संचमान्यता करण्यात यावी.

९. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०५३११७०२५५०९३४ असा आहे. सदर शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.05.31 17:16:20 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता (विधान परिषद / विधानसभा) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
५) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

६) प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग (सर्व).

७) सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन समाज कल्याण (सर्व).

८) मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव

९) प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक

१०) निवडनस्ती (विजाभज-१).